राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या वेगवर्धक दुग्ध उत्पादन कार्यक्रमांतर्गत सिन्नर तालुका दूध उत्पादक व प्रक्रिया संघ मर्या. सिन्नर, जि नाशिक या संघाच्या पुर्नमंजूरीस मान्यता देणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१२/प्र.क्र.४ /पदुम-८**

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२

तारीख: १३ मे २०२०

वाचा : १) शासन समक्रमांक दिनांक १९.१.२०१२, दि.२६.२.२०१३ व दि.३.१२.२०१३ रोजीचा शासन निर्णय.

२) शासन निर्णय क्र. राकृवि २०१२/प्र.क्र.४/पदुम-८, दि.४.१२.२०१४

३) शासन निर्णय क्र. राकृवि २०१२/प्र.क्र.४/पदुम-८, दि.६.०२.२०१५

४) क्र. आरकेव्ही-०३१७/सी.आर.१४/आरकेव्हीवाय सेल, दि.९ जून, २०१७ अन्वये राज्यस्तरीय प्रकलप मंजूरी समितीच्या बैठकीचे निर्गमित केलेले इतिवृत्त.

५) क्र. आरकेव्ही-०१२०/सी.आर.१४/१४-अे, दि.१९ मार्च, २०२० अन्वये राज्यस्तरीय प्रकलप मंजूरी समितीच्या बैठकीचे निर्गमित केलेले इतिवृत्त.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार "उत्पादन व वृध्दी", पायाभूत सुविधा व साधनसामुग्री", "विशेष योजना व परिवर्तनशील निधी" या घटकांतर्गत "राज्य प्रकल्प छाननी समिती" व तद्‌नंतर "राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती" समोर प्रकल्प प्रस्ताव सादर करण्यात येतात. दुग्धव्यवसाय या उपविभागांतर्गत "पायाभूत सुविधा व साधनसामग्री" या घटकाखाली राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत वेगवर्धक दुग्ध उत्पादन कार्यक्रमाखाली,संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सिन्नर तालुका दूध उत्पादक व प्रक्रिया संघ मर्या. सिन्नर, जि नाशिक या सहकारी दूध संघाचा रु.२०५२.५८ लक्ष इतक्या रकमेच्या सुधारित प्रकल्प प्रस्तावास शासनाने मंजूरी दिली आहे. संदर्भ क्र. १ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये सदर संघास वितरित करण्यात आलेला रु.४६२.०० लक्ष निधी वगळुन राकृवियो हिस्सा म्हणून उर्वरित निधी रु.५६४.२९ लक्ष इतका निधी सुध्दा संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला. सदर प्रकल्पाकरिता राकृवियो हिस्सा म्हणून रु. २०० लक्ष इतका निधी संदर्भ क्र. ३ अन्वये वितरित करण्यात आला.

तद्‌नंतर सदर संघास रु.३.६२२ कोटी इतका निधी वितरित करण्यात आला होता. मात्र, सदर निधी प्रकल्पाच्या कामातील अनियमिततेमुळे दिर्घ कालावधी उलटूनही अखर्चित राहिल्याने संदर्भ क्र. ४ अन्वये सदर निधी नामंजूर करण्यात आला. यासंदर्भात दिनांक २६ फेब्रुवारी, २०२० रोजी झालेल्या राज्य प्रकल्प मंजूरी समितीसमोर सिन्नर तालुका सहकारी दूध संघाच्या प्रकल्पाचे कामकाज सुरु झाले असून सदर प्रकल्प पूर्णत्वास जाणे आवश्यक असल्याने सदर संघाचा नामंजूर करण्यात आला रु.३.६२२ कोटी हा निधी पुन्हा मंजूर करावा अशी विनंती आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी केली होती. त्यास अनुसरुन संदर्भ क्र. ५ अन्वये निर्गमित केलेल्या इतिवृत्तानुसार सिन्नर तालुका सहकारी दूध संघाचा नामंजूर करण्यात आलेला रु.३.६२२ कोटी इतका निधी

पुन्हा मंजूर करण्यात आला. सदर वस्तुस्थिती लक्षात घेऊन सिन्नर तालुका सहकारी दूध संघास पुन्हा मंजूर करण्यात आलेल्या रु.३.६२२ कोटी इतक्या निधीतुन प्रकल्पाच्या उर्वरित कामकाजास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) सदर संघास वितरित करण्यात येत असलेल्या निधीचा योग्य विनियोग होईल याची हमी म्हणून आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी, सिन्नर तालुका सहकारी दूध संघाच्या प्रत्येक संचालकाच्या वैयक्तिक मालमत्तेचे हमीपत्र घ्यावे.

२) मंजूर करण्यात आलेला निधी हा प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात समाविष्ट मंजूर घटकांकरीता संघाने खर्ची घालावा.

३) मंजूर प्रकल्प किंमतीपेक्षा प्रकल्पावर होणारा अधिकचा खर्च संघ स्वत: सोसेल. वाढीव प्रकल्पावर होणाऱ्या खर्चासाठी शासन जबाबदार राहणार नाही. तसेच त्याकरीता शासनामार्फत मंजूर प्रकल्प किंमती व्यतिरिक्त निधी मंजूर करण्यात येणार नाही.

४) राज्यातील दूध कमतरता/अतिरिक्त दूध उत्पादन काळात राज्य शासनाचा निर्णय संघावर बंधनकारक राहील.

५) मंजूर करण्यात आलेल्या निधी बाबत झालेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे जी.एफ.आर.नियम क्रमांक १४९ अन्वये विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे ठेवावेत व झालेल्या खर्चाचा अहवाल आणि लेख्यांच्या संदर्भात झालेले लेखापरीक्षण या संबंधीची माहिती आयुक्त,दुग्धव्यवसाय यांना सादर करण्यात यावी.

६) सहकारी संघाला मंजूर निधीमधून प्राप्त झालेली मिळकतीचे (स्थावर/निमस्थावर) अशा सर्व मिळकतीचे लेखे लेखापरीक्षणास आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावेत.

७) संघाला मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून झालेल्या मिळकतीतील वाढीची विल्हेवाट लावण्यापूर्वी शासनाची मान्यता घेणे संघास बंधनकारक राहील.

८) संघास उपलबध करुन देण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संघाने आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचेमार्फत शासनास सादर करावे. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याखेरीज उर्वरित निधी वितरीत केला जाणार नाही. तसेच वितरीत निधी विहित कालावधीत खर्च न केल्यास प्रकलप कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल.

९) मंजूर प्रकल्पाची यशस्वीरीत्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्ह्याचे "जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी"यांची राहील. आयुक्त, दुग्धव्यवसाय हे प्रकल्पाकरीता "संनियंत्रण अधिकारी" म्हणून नियंत्रण ठेवतील.

१०) शासन निधी वितरीत होईल त्या प्रमाणात संघाने आपला हिस्सा गुंतविणे आवश्यक राहील. सदर प्रकलप राबविणे सोयीचे व्हावे त्यासाठी संबंधित जिल्ह्याचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी व संघाचे व्यवस्थापकीय संचालक यांचे संयुक्त खाते बँकेत उघडण्यात यावे. या संयुक्त खात्यामध्ये संघाच्या हिस्स्याची रक्कम ज्या प्रमाणात उपलब्ध होईल त्याच प्रमाणात या योजने अंतर्गत मंजूर असलेली तरतूद " जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी" यांनी संबंधित संघास अदा करावी.

११) या योजनेअंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या निधीचा विनियोग योग्यरित्या न झाल्यास ती शासकीय नियमानुसार व बंधपत्रातील अटी व तरतूदीनुसार व्याजासहीत संबंधित संघाकडून वसूल करण्याची जबाबदारी आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांची राहील.

१२) शासन योजनेअंतर्गत खरेदी करण्यात येणारे सर्व साहित्य व उभारण्यात येणाऱ्या प्रकल्पासाठी संघाने शासन कार्यपध्दतीप्रमाणे निविदा प्रक्रियेचा अवलंब करावा.

१३) या योजनेअंतर्गत बसविण्यात येणाऱ्या साहित्यांवर तसेच योजनेअंतर्गत उभारण्यात येणाऱ्या दुग्धशाळा व दूध प्रक्रिया प्रकल्पावर हा प्रकल्प " राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत" असे ठळकपणे दर्शनी भागावर नमूद करणे आवश्यक राहील. याबाबतची खात्री जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांनी करावी.

संस्थेने सादर केलेल्या प्रकल्प अहवालानुसार प्रकल्प पूर्णत्वास नेण्याची जबाबदारी खालीलप्रमाणे गठीत करण्यात आलेल्या " प्रकल्प अंमलबजावणी समिती" ची राहील.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी | --- अध्यक्ष |
| २) | विभागीय उपनिबंधक, सहकारी संस्था (दुग्ध),नाशिक | --- उपाध्यक्ष |
| ३) | संघाचे अध्यक्ष | --- सदस्य |
| ४) | संबंधित जिल्ह्याचे जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी | --- सदस्य |
| ५) | संबंधित जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त | --- सदस्य |
| ६) | आयुक्त दुगधव्यवसाय यांनी नियुक्त केलेला प्रतिनिधी | --- सदस्य |
| ७) | संबंधित संघाचे व्यवस्थापकीय संचालक | ---- सदस्य सचिव. |

उपरोक्त समितीने आपला अहवाल वेळोवेळी शासनास व आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांना सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक २०२००६२५१८४६४३४९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, serialNumber=3cec7a5cf8d124a0d8e15bfc85a782c01ef27eaee8bedaba4dce3416562097ac, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2020.07.10 16:47:45 +05'30'

**( राजेश गोविल )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय)/ मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव,महाराष्ट राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग

७. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य,
९. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,नाशिक.
१०. विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) नाशिक.
११. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, नाशिक.
१२. जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त, नाशिक
१३. जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, नाशिक.
१४. महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१५. अध्यक्ष, सिन्नर तालुका दूध उत्पादक व प्रक्रिया संघ मर्या. सिन्नर, जि नाशिक
१६. निवडनस्ती.